सन २०२५-२६ या वर्षासाठी "सुधारित पीक विमा योजना" राबविण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक प्रपीवियो-२०२५/प्र.क्र.६६/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ९ मे, २०२५.

वाचा :-

१) केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाच्या प्रधानमंत्री पीक विमा योजनेच्या सुधारित मार्गदर्शक सूचना २०२०
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२३/प्र.क्र.३४/११-अे, दि.२३.०६.२०२३
३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०२३/प्र.क्र.५२/११-अे, दि.२६.०६.२०२३
४) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दि.२०.३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
५) केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाच्या प्रधानमंत्री पीक विमा योजनेच्या मार्गदर्शक सूचना दि.०६.११.२०२४
६) केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.११०१९/०१/२०२२ Crop Ins(FTS-१११८७५), दि.०१.०४.२०२५.
७) मा. मंत्रिमंडळाच्या दि.२९.०४.२०२५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री पीक विमा योजना, खरीप हंगाम २०१६ पासून, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात राबविण्यात येत आहे. राज्यात "सर्वसमावेशक पीक विमा योजना" राबविण्यास संदर्भ क्र.(२) अन्वये मान्यता देण्यात आली असून, प्रधानमंत्री पीक विमा योजना, खरीप हंगाम २०२३ ते रब्बी हंगाम २०२५-२६ हंगामासाठी भारतीय कृषि विमा कंपनी, आयसीआयसीआय लोंबार्ड जनरल इंशुरन्स कं.लि., एचडीएफसी इर्गो जनरल इन्शुरन्स कंपनी लि., ओरिएन्टल इन्शुरन्स कं.लि., युनायटेड इंडिया जनरल इंशुरन्स कं. लि., युनिवर्सल सोम्पो जनरल इंन्शुरन्स कं. लि., चोलामंडलम एम. एस. जनरल इन्शुरन्स कं. लि., रिलायन्स जनरल इंन्शुरन्स कं. लि., एस.बी.आय. जनरल इंन्शुरन्स कं.लि., या ९ विमा कंपन्यांमार्फत संदर्भ क्र.(३) येथील शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे.

मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षेतखाली दि.२०.०३.२०२५ रोजी झालेल्या बैठकीत देण्यात आलेल्या निर्देशांस अनुसरुन, राज्यात सद्य:स्थितीत राबविण्यात येणाऱ्या सर्वसमावेशक पीक विमा योजनेमध्ये बदल करुन, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार शेतकऱ्यांकडून खरीपासाठी २%, रब्बीसाठी १.५% व नगदी पिकांना ५% असा शेतकरी हिस्सा घेवून व उर्वरीत पीक हप्ता केंद्र व राज्य शासनामार्फत देण्यात येऊन, पीक कापणी प्रयोगांवर आधारित, "सुधारित पीक विमा योजना" राबविण्याबाबतच्या प्रस्तावास दि.२९.०४.२०२५ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुलक्षून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२५-२६ च्या खरीप हंगामापासून राज्यात, “सर्वसमावेशक पीक विमा योजनेमध्ये” बदल करून, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार, पूर्वीप्रमाणे विहीत केल्यानुसार, खरिपासाठी २%, रब्बीसाठी १.५% व नगदी पिकांना ५% असा शेतकरी हिस्सा घेवून, उर्वरीत पीक हप्ता हा केंद्र व राज्य शासन मार्फत देण्यात येऊन, पीक कापणी प्रयोगांवर आधारित, “सुधारित पीक विमा योजना” राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजना अधिसूचित क्षेत्रातील अधिसूचित पिकांसाठी, विमा क्षेत्र घटक (Area Approach) धरुन, केंद्र शासनाच्या वेळोवेळी निर्गमित होणा-या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे, खरीप व रब्बी हंगामाकरिता राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सुधारित पीक विमा योजना खरीप व रब्बी हंगामाकरिता, केवळ खालील जोखमीच्या बाबींचा समावेश करुन राबविण्यात येईल:-

“पीक पेरणीपासून काढणीपर्यंतच्या कालावधीत वीज कोसळणे, गारपीट, वादळ, चक्रीवादळ यांमुळे लागलेली नैसर्गिक आग, पूर, क्षेत्र जलमय होणे, भूस्खलन, अतिवृष्टी, दुष्काळ, पावसातील खंड, किड व रोग इत्यादी बाबींमुळे उत्पादनात येणारी घट.”

४. सदर योजनेमध्ये शेतकरी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार, केंद्र शासनाचे पीक विमा पोर्टल, सामायिक सुविधा केंद्र, बँक इत्यादी माध्यमांद्वारे सहभाग घेऊ शकतो.

५. “सुधारित पीक विमा योजना”, ही योजना खरीप हंगाम २०२५ ते रब्बी हंगाम २०२५-२६ या हंगामांसाठी Cup & Cap Model (८०:११०) नुसार राबविण्यात येईल. तसेच, पुढील कार्यवाही केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात येऊन त्याबाबतचा शासन निर्णय स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येईल.

६. सुधारित पीक विमा योजना राबविण्यासाठी, नव्याने निविदा प्रक्रिया राबविण्यात येईल. निविदा प्रक्रिया राबविल्यानंतर प्राप्त होणाऱ्या विमा हप्ता दरांच्या तुलनात्मक माहितीच्या आधारे राज्यस्तरीय पीक विमा समन्वय समितीच्या मान्यतेने योजनेची अंमलबजावणी करण्यात येईल.

७. “सुधारित पीक विमा योजनेंतर्गत” नुकसान भरपाई निश्चितीसाठी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अधिसूचित क्षेत्रातील पिकांचे सरासरी नुकसान काढताना, भात, गहू, सोयाबीन व कापूस या पिकांचे किमान ५० टक्के भारांकन तंत्रज्ञान आधारित उत्पादनाला देऊन, ५०% भारांकन पीक कापणी प्रयोगांतर्गत प्राप्त होणा-या उत्पन्नास दिले जाईल व यात मेळ घालून उत्पादन निश्चित करण्यात येईल. उर्वरीत अधिसूचित पिकांची नुकसान भरपाई, नियमित पीक कापणी प्रयोग आधारित निश्चित करण्यात येईल. यासंदर्भात केंद्र शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना आणि राज्यस्तरीय पीक विमा समन्वय समितीने दिलेले निर्देश लागू राहतील.

८. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार योजनेअंतर्गत अंमलबजावणी यंत्रणांची निवड झाल्यानंतर, कार्यारंभ आदेश देते वेळी मागील हंगामातील राज्य हिस्सा विमा हप्ता रकमेच्या ५०% रक्कम, केंद्र व राज्य शासनाच्या Escrow Account मध्ये जमा करण्यात येईल. यासाठी उघडावयाच्या Escrow Account ला मान्यता देणेबाबतचा शासन निर्णय स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येईल.

९. सुधारित पीक विमा योजनेअंतर्गत होणारा खर्च हा अनिवार्य खर्चांतर्गत, प्रधानमंत्री पीक विमा योजनेच्या पुढील लेखाशिर्षाखाली भागविण्यात येईल.

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११०, पीक विमा (००) (०८) प्रधानमंत्री पीक विमा योजनेंतर्गत विमा हप्त्यासाठी अर्थसहाय्य (अनिवार्य)**
**राज्य हिस्सा (२४०१ A ६६४) योजनेतर, ३३- अर्थसहाय्य.**

**१०.** या योजनेसाठी आयुक्त(कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे नियंत्रण अधिकारी राहतील. तसेच, सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**११.** केंद्र शासनाने सदर योजनेकरिता वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील सर्व अटी व शर्ती योजनेतील सर्व सहभागी होणाऱ्यांकरिता लागू राहतील.

**१२.** सदर योजनेची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, पुणे यांची राहील. तसेच, आयुक्त (कृषी) यांनी, योजनेच्या अंमलबजावणीबाबत मासिक आढावा घेऊन त्याबाबतचा प्रगती अहवाल शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

**१३.** प्रधानमंत्री पीक विमा योजनेअंतर्गत राबविण्यात येणारी, पुनर्रचित हवामान आधारित फळपीक विमा योजना, आहे त्या स्वरुपात चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**१४.** हा शासन निर्णय**,** नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१९५/का.१४३१, दि.१५.०४.२०२५ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१८१/२०२५/व्यय-१, दि.०९.०५.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**१५.** प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२५०५०९१८४१४९०१५८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA
MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.05.09 18:42:59 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास व गृह निर्माण) यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
५. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७. सर्व मा.विधानसभा / मा. विधानपरिषद सदस्य
८. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
९. अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०.अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुमविभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१३.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१४.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५.सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१६.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, अंबादिप बिल्डिंग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली.
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२१.सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा ), मुंबई.
२३.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
२४.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा ), नागपूर
२५.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२६.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२७.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२९.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८.सर्व तहसिलदार
२९.सर्व तालुका कृषि अधिकारी
३०.निवडनस्ती, कार्यासन ११-अे.